**कृषि विद्यापीठे, संलग्न कृषि महाविद्यालये, संलग्न कृषि विद्यालये व ग्रामीण शिक्षण संस्था, वर्धा व अमरावती येथील महिला कर्मचाऱ्यांची प्रसूती रजेची मर्यादा १८० दिवसापर्यन्त वाढविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : संकीर्ण-२०१०/प्र.क्र. ५३६/६-अे
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांकः ९. ९.२०११

वाचा : शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः अरजा-१४०९/प्र.क्र. ८/०९/सेवा-९, दि. २४.८.२००९

**शासन निर्णय :**

राज्य शासनाने केंद्र शासनाच्या धर्तीवर राज्य शासकीय महिला कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असलेली ९० दिवसाची प्रसूती रजेची मर्यादा १८० दिवसापर्यन्त वाढविण्याबाबत शासन निर्णय दि. २४.८.२००९ रोजी आदेश काढले आहेत. त्याच धर्तीवर विभागांतर्गत कृषि विद्यापीठे, संलग्न कृषि महाविद्यालये, संलग्न कृषि विद्यालये व ग्रामीण शिक्षण संस्था, वर्धा व अमरावती येथील महिला कर्मचाऱ्यांची प्रसूती रजेची मर्यादा ९० दिवसावरुन १८० दिवसापर्यन्त वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत आता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

१) महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ च्या नियम ७४ मधील तरतुदीनुसार कृषि विद्यापीठे, संलग्न कृषि महाविद्यालये, संलग्न कृषि विद्यालये व ग्रामीण शिक्षण संस्था, वर्धा व अमरावती येथील महिला कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असलेली ९० दिवसांची प्रसूती रजेची मर्यादा १८० दिवसापर्यन्त वाढविण्यात यावी. या सुविधेचा लाभ फक्त दोन अपत्यांपुरताच मर्यादित राहील. प्रसूती रजा मंजूर करण्याच्या इतर शर्ती पूर्वीप्रमाणे यापुढेही राहतील.

२) या सुविधेचा लाभ हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू राहील.

३) या आदेशान्वये लागू करण्यात आलेल्या सुधारित वेतन संरचनेमुळे होणारा अतिरिक्त खर्च शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते ज्या लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात येतात त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व त्या खालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. या संदर्भात प्रचलीत शासन आदेश/ कार्यपध्दतीचा अवलंब करावा.

४) हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १४७/सेवा-६, दि. २७ एप्रिल २०११ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून सांकेतांक ...२०११०९१३१५१७५९००१. असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(दि.भि. कुदळे )
शासनाचे उप सचिव

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुबई,
सदस्य सचिव, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, १३२-ब, भांबुर्डा, भोसले नगर, पुणे ४११ १०७,

वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, १३२-ब, भांबुर्डा, भोसले नगर, पुणे ४१११०७,
कुलगुरु, कुलसचिव, नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा- अहमदनगर (२० प्रती)
कुलगुरु, कुलसचिव, नियंत्रक, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला (२० प्रती)
कुलगुरु, कुलसचिव, नियंत्रक, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी (२० प्रती)
कुलगुरु, कुलसचिव, नियंत्रक, डॉ. बाळासाहेब सावंत कोंकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा-रत्नागिरी (२० प्रती)
संचालक, महात्मा गांधी आदिवासी जनता विद्यालय, कोसबाड हील (५ प्रती)
अधिक्षक, कृषि विद्यालय, कोसबाड हील (५ प्रती)
अधिक्षक, कृषि विद्यापीठ, मालेगाव कॅम्प, जि. नाशिक (५ प्रती)
प्राचार्य, श्री. शिवाजी कृषि महाविद्यालय, अमरावती (५ प्रती)
प्राचार्य, आनंद निकेतन कृषि महाविद्यालय, वरोरा (५ प्रती)
अधिक्षक, जनता कृषि विद्यालय, अमरावती (५ प्रती)
प्राचार्य, ग्रामीण शिक्षण संस्था, वर्धा (५ प्रती)
प्राचार्य, ग्रामीण शिक्षण संस्था, अमरावती (५ प्रती)
महालेखापाल, महाराष्ट्र-१, लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२, लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता, मुंबई (५ प्रती)
महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा) महाराष्ट्र,मुंबई
आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे (२ प्रती)
आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे (२ प्रती)
आयुक्त मत्स्यव्यवसाय, तारापोरवाला मत्स्यालय, मुंबई (२ प्रती)
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक लेखा निधी, कोकण भवन, नवी मुंबई (५ प्रती)
जिल्हा पशुसंवर्धन उपसंचालक, अहमदनगर/अकोला/परभणी/रत्नागिरी (प्रत्यकी २ प्रती)
उप विभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर/अकोला/परभणी/रत्नागिरी (प्रत्यकी २ प्रती)
जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर/अकोला/परभणी/रत्नागिरी (प्रत्यकी २ प्रती)
वित्त विभाग, व्यय-१, सेवा-१०, मंत्रालय, मुंबई ३२,
कक्ष अधिकारी, २अे/७-अे/८-अे/१२-अे कार्यासने, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२,
निवड नस्ती, ६-अे कार्यासन
प्रत : ६-अे कार्यासन संग्रहार्थ